**चाकूर, जिल्हा लातूर येथील दिवाणी न्यायाधीश (कनिष्ठ स्तर) या न्यायाधीशांच्या निवासस्थानाचे भाडे करार नुतनीकरण करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
विधी व न्याय विभाग,
**शासन निर्णय क्र.एसीसी २०१०/६५१/(३७)/का.१२**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
**दिनांक : ५ फेब्रुवारी, २०११.**

**वाचा :-** जिल्हा व सत्र न्यायालय, लातूर यांचे पत्र क्र.काव्यवि/(प्रशा)/४५४५/२००९, दिनांक २५.८.२००९.

**<u>शासन निर्णय</u> :-**

चाकूर, जिल्हा लातूर येथील दिवाणी न्यायाधीश (कनिष्ठ स्तर) या न्यायाधीशांच्या निवासस्थानासाठी श्रीमती फुलाबाई राजाराम गोलावार यांची सदनिका रु.२७३५/- (रुपये दोन हजार सातशे पस्तीस फक्त) प्रतिमाह या दराने दिनांक १.४.२००८ ते ३१.३.२०११ या कालावधीसाठी भाडे करारनाम्याचे नुतनीकरण करण्यास व त्याप्रमाणे भाडे अदा करण्यास शासन मंजूरी देत आहे.

२. या प्रित्यर्थ होणारा खर्च मागणी क्र.जे-१, २०१४-न्यायदान, १०५-दिवाणी व सत्र न्यायालये, १०५(२) जिल्हा व सत्र न्यायाधीश, (२०१४ ०१७ २) १४-भाडेपट्टी व कर या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात येऊन तो सन २०१०-११ या कालावधीत मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

२. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.७६३/१०/व्यय-६, दिनांक २८.१.२०११ अन्वये त्यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( शिरीष संकपाळ )**
**कार्यासन अधिकारी.**

प्रति,

प्रबंधक (निरीक्षणे), उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई, (पत्राने)

प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, लातूर,

दिवाणी न्यायाधीश (कनिष्ठ स्तर), चाकूर, जिल्हा लातूर,

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर,

महालेखापाल (लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर,

जिल्हा कोषागार अधिकारी, लातूर,

उप कोषागार अधिकारी, चाकूर, जिल्हा लातूर,

वित्त विभाग/व्यय-६,

विधी व न्याय विभाग/का.७, का.२३ व का.२४,

निवड नस्ती.